“प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पूरक अनुदान” या योजनेअंतर्गत रु. ६२,९७,८९५/- इतकी रक्कम विमा कंपनीस वितरीत करण्यासाठी मंजूरी देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.८० /११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २३ फेब्रुवारी, २०२३.

वाचा-

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.१२/११-अे, दि. ३१.५.२०१९
२. कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.१२/११-अे, दि. ११.०९.२०१९
३. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क.४३/अर्थ-३, दि.०४/०४/२०२२
४. कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र. प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.८०/११-अे, दि. २२.०६.२०२२.
५. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.८०/११-अे, दि. १५.११.२०२२.
६. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.८०/११-अे, दि. ३०.११.२०२२.
७. संचालक (वि. व प्र.), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. कृषिआ/सां.८/ न्युन.१०००/ १७००/२०२३, दि.१७.०१.२०२३.

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री फसल विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार पात्र शेतकऱ्यांना नुकसान भरपाई निश्चित करण्याची कार्यवाही करण्यात येत असून काही प्रकरणी पिक विमा नुकसान भरपाई अत्यंत कमी प्रमाणात परिगणित होत आहे. अशा प्रकरणांमध्ये लाभार्थी शेतकऱ्यांना विम्याच्या परताव्यापोटी नुकसान भरपाई रक्कम रु.१०००/- पेक्षा कमी येत असल्याने किमान रक्कम रु.१०००/ अदा करण्यासंदर्भात संदर्भ क्र. (१) अन्वये निर्णय घेण्यात आला असून संदर्भ क्र.२ च्या परिपत्रकान्वये सदर योजनेसंदर्भातील अवलंबावयाची कार्यपध्दती आणि अटी व शर्ती विहीत करण्यात आल्या आहेत. कृषि आयुक्तालयाच्या संदर्भ क्र. (७) च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार “प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पूरक अनुदान” योजनेअंतर्गत प्रधानमंत्री पीक विमा योजना रब्बी हंगाम २०२१-२२ करीता रु.६२,९७,८९५/- इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पूरक अनुदान" या योजनेअंतर्गत कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र.७ येथील दि.१७.०१.२०२३ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार प्रधानमंत्री पीक विमा योजना रब्बी हंगाम २०२१-२२ करीता स्तंभ क्र. ६ मध्ये एकूण रु. ६२,९७,८९५/- इतकी रक्कम खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**रब्बी हंगाम २००२१-२२**

**(रक्कम रु.)**

| अ. क्र. | विमा कंपनीचे नाव | रु १०००/- च्या मर्यादेत नुकसान भरपाई पात्र शेतकरी संख्या | एकुण नुकसान भरपाई देय रक्कम | विमा कंपनीकडून निश्चित नुकसान भरपाई रक्कम | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | रिलायन्स जनरल इंशुरंस कंपनी लि. | १९०३ | १९०३००० | ९१६५७५ | ९८६४२५ |
| २ | आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इं. कं. लि. | ७४१ | ७४१००० | ५७२७५ | ६८३७२५ |
| ३ | एचडीएफसी इर्गो जनरल इं. कं. लि. | ३४७३ | ३४७३००० | १११२२५५ | २३६०७४५ |
| ४ | बजाज अलियान्झ जनरल इं. कं. लि. | ३ | ३००० | २७४८ | २५२ |
| ५ | इफ्को टोकीओ जनरल इं. कं. लि. | २३९३ | २३९३००० | १५०२८९३ | ८९०१०७ |
| ६ | भारतीय कृषि विमा कंपनी लि. | २२९१ | २२९१००० | ९१४३५९ | १३७६६४१ |
| | **एकूण** | **१०८०४** | **१०८०४०००** | **४५०६१०५** | **६२९७८९५** |

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (१०) प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पुरक अनुदान**
**(२४०१ B०५२) (अनिवार्य)**
**३३, अर्थसहाय्य**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पुरक अनुदान योजनेच्या शासन निर्णय व योजनेसंदर्भातील अवलंबवावयाची कार्यपध्दती आणि अटी व शर्ती नूसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी तर सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२२३११३९२८६६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SARITA RISHI
BANDEKAR DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.02.23 11:43:29 +05'30'

**( सरिता बांदेकर- देशमुख )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१०. वित्त विभाग (व्यय-१/ अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई- ३२
११. सह सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१२. कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१३. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी लि., स्टॉक एक्सचेंज, २० वा मजला, फोर्ट, मुंबई -२३.
१४. विभागीय व्यवस्थापक, रिलायंस जनरल इन्शुरन्स कंपनी लि.वेस्टर्न एक्सप्रेस हायवे, ५ वा माळा, चिंतामणी अव्हेन्यू, विराणी औद्योगिक वसाहत, गोरेगाव, मुंबई- २३
१५. विभागीय व्यवस्थापक, एचडीएफसी इर्गो जनरल इन्शुरन्स कंपनी लि., १ माळा , एचडीएफसी हाऊस, १६५-६६/ बॅक बे, चर्चगेट, मुंबई-२०.
१६. विभागीय व्यवस्थापक, इफ्को टोकीओ जनरल इंशुरन्स कं. लि, १००१, १० मजला, सुनीत कॅपीटल, सीटीएस९६७/२, सेनापती बापट रोड, पुणे.
१७. विभागीय व्यवस्थापक, बजाज अलायन्झ जनरल इंन्शुरन्स कं.लि, कॉमर झोन, पहिला मजला, सम्राट अशोक मार्ग, फुले नगर, पुणे ४११००६.
१८. विभागीय व्यवस्थापक, आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इंशुरन्स कं.लि., आयसीआयसीआय हाऊस, ४१४, वीर सावरकर मार्ग, सिध्दीविनायक मंदिराजवळ, प्रभादेवी, मुंबई- ४०० ०२५.
१९. निवड नस्ती (कार्यासन ११-अे).